**श्री. मंगेश रामदासजी वंजारी, अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली यांना शासकीय सेवेतून कमी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. संकीर्ण-१११९/प्र.क्र.२२/१९/तांशि-७**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०००३२,
दिनांक : २२ ऑगस्ट, २०२३.

<u>संदर्भ</u>: १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९/०२/२०१६,
२) या विभागाचे शासन निर्णय क्र. ससेनि-३२१७/प्र.क्र.६१/१७/तंशि-७, दि. २७/०९/२०१७,
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. ४अ/ आस्था(२) /२०२३/ ४४६, दि.१५/०६/२०२३.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये श्री.मंगेश रामदासजी वंजारी यांची अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली या पदावर २ वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात आली होती. तसेच सदर पदावर रूजू होण्यास दि.२८/०२/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानुषंगाने श्री. वंजारी अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी या पदावर दि.२६/०२/२०१८ रोजी रूजू झाले आहेत.

०२. तद्नंतर, दुस-याच दिवसापासून म्हणजे दि.२७/०२/२०१८ ते दि.१५/०३/२०१८ पर्यंत ते विनापरवानगी गैरहजर होते. श्री. वंजारी हे दि.१६/०३/२०१८ रोजी संस्थेत हजर झाले परंतु, रूजू अहवाल सादर न करता खाजगी कारणास्तव Leaving Early असा अर्ज दि.१७/०३/२०१८ रोजी सादर करून ते दि.१८/०३/२०१८ पासून आजतागायत विनापरवानगी कर्तव्यावर अनुपस्थित आहेत.

०३. याबाबत श्री. वंजारी यांना शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली या संस्थेतील विभाग प्रमुख, संगणक अभियांत्रिकी यांनी दि.२३/०३/२०१८ अन्वये समजपत्र दिले होते. तसेच, प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली यांनी श्री. वंजारी यांना विनापरवानगी अनुपस्थितीबाबत व रूजू न झाल्यास कार्यवाही करण्यात येईल याबाबत दि.५/४/२०१८ अन्वये कळविले आहे. परंतु, श्री. वंजारी कर्तव्यावर रूजू झाले नाहीत अथवा त्यांनी कोणत्याही प्रकारचा प्रतिसाद दिलेला नाही. ते परिविक्षाधिन कालावधीत असून रूजू झाल्यापासूनच परिविक्षाधिन कालावधीत त्यांचे काम/ वर्तणुक अयोग्य वाटत असल्याने दि.१९/०१/२०१९ च्या पत्रान्वये श्री. वंजारी यांची वर्तणूक नियुक्ती आदेशातील अ.क्र.६(४) नुसार समाधानकारक नसल्याने नियुक्ती प्राधिकारी म्हणून शासन स्तरावरुन योग्य ते आदेश निर्गमित करण्याबाबत संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी कळविले होते.

त्यास अनुसरून श्री. वंजारी यांना शासन ज्ञापन क्र. संकीर्ण-१११९/प्र.क्र.२२/१९/तांशि-७, दि.२८/०२/२०१९ अन्वये त्यांना सेवेतून कमी का करण्यात येऊ नये याबाबतचा खुलासा २ आठवड्यात सादर करण्याबाबत कळविले होते. सदर ज्ञापनाच्या अनुषंगाने श्री. वंजारी यांनी कोणत्याही प्रकारचा खुलासा सादर केला नाही.

०४. शासन ज्ञापनाचा कोणत्याही प्रकारचा खुलासा श्री. वंजारी यांनी न केल्याने त्यांची प्रदीर्घ विनापरवानगी अनुपस्थिती, त्यांची गैरहजर राहण्याची प्रवृत्ती विचारात घेता श्री. वंजारी यांच्या नियुक्ती आदेशातील अ.क्र.६ (४) नुसार त्यांची वर्तणूक असमाधानकारक असल्याने त्यांना शासन सेवेतून कमी करण्याबाबत संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. सबब, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ

क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदी तसेच, संदर्भ क्र. २ येथील नियुक्ती आदेशातील अटी व शर्तीनुसार, श्री. मंगेश रामदासजी वंजारी, अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी यांच्या परिविक्षाधीन कालावधीतील कामाचा दर्जा व वर्तणूक "असमाधानकारक" असल्याने त्यांना शासन सेवेतून कमी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

श्री. मंगेश रामदासजी वंजारी यांची संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये परिविक्षाधीन अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी या पदावर नियुक्ती करण्यात आली होती. श्री.वंजारी हे सदर पदावर कार्यरत असताना परिविक्षाधीन कालावधीतील कामाचा दर्जा व वर्तणूक "असमाधानकारक" आढळून आल्याने श्री. वंजारी यांना या आदेशाच्या दिनांकापासून शासन सेवेतून कमी करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

३. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी पुढील आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८२२१५४०१२५४०८ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER
LAXMAN
DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.08.22 15:45:40 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.मंगेश रामदासजी वंजारी, अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

**प्रत:**

१) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर,
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्ा, मुंबई,
४) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई,
५) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
६) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली,
७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) निवड नस्ती, तांशि-७.